सहाय्यक पोलीस अधीक्षकांची पाच अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.

परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी-६१ वी तुकडी

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : आयपीएस-१७१०/प्र.क्र.८७/पोल-१,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १४ जून. २०१०.

**प्रस्तावना :-** भारतीय पोलीस सेवेच्या ६१ व्या तुकडीतील खालील पाच परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.१८.०१.२०१० ते दि.२४.०७.२०१० पर्यतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरीता सहाय्यक पोलीस अधीक्षकाची पाच अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर पदे भारतीय पोलीस सेवेतील कनिष्ठ वेतनश्रेणीतील म्हणजेच रुपये १५,६००-३९,१००+ ग्रेड पे ५,४००/- या वेतनश्रेणीतील आहेत. :-

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थींचे नांव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | श्रीमती ज्योती सिंग, | अहमदनगर |
| २ | श्रीमती मनिता मलिक | जळगांव |
| ३ | श्री. अखिलेश कुमार सिंग | अकोला |
| ४ | श्री. परमजित दहिया | जालना |
| ५ | श्री. सदिप बी.पाटील | चंद्रपूर |

उपरोक्त अधिकाऱ्यांच्या दिनांक १८.०१.२०१० ते दिनांक २४.०७.२०१० या कालावधीतील वेतन व भत्ते यासाठी रुपये १०,२७,९५०/- (रुपये दहा लाख सत्ताविस हजार नऊशे पन्नास फक्त) इतका खर्च मंजूर अनुदानातून भागविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** भारतीय पोलीस सेवेच्या ६१ व्या तुकडीतील श्रीमती ज्योती सिंग व इतर अशा एकूण ५ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना दि.१८.०१.२०१० ते. दि.२४.०७.२०१० पर्यत महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक आणि त्यानंतर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्हयात प्रशिक्षण कालवधीकरिता वेतन व भत्ते यासाठी रु.१०,२७,९५०/- (रुपये दहा लाख सत्ताविस हजार नऊशे पन्नास फक्त ) इतका खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस-(००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८)" या

उपलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून (०१) वेतन या उद्दीष्टामधून सन २०१०-११ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५६/१०/व्यय-७, दि.१५.०५.२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास वि. बिलोणीकर )
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
  यांना त्यांचे पत्र क्र.टीआरजी/रोमन एक/५(१)/आयपीएस प्रोबेशन/६१आरआर बॅच/२०१०/६१५, दि.११ फेब्रुवारी, २०१० च्या संदर्भात.
- संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
- महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
- सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती).
- वित्त विभाग, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१ / अर्थसंकल्प-३ / अर्थसंकल्प-१० / विनियम, मंत्रालय, मुंबई.
- अवर सचिव, कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
- लेखा अधिकारी, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
- वैयक्तिक नस्ती / निवड नस्ती (पोल-१).